# ताऱ्यांची भेट




लेखिका:

फ्लेविआ

आणि

लिसा विड्न

मराठी अनुवाद:

सुशील मेन्सन

कोण्या एके काळी एक लहान मुलगी होती. ती अनाथ आणि खूप गरीब होती. तिच्याकडे राहायला जागा नव्हती. तिच्याकडे फक्त अंगावरचे कपडे, डोक्यावरचा स्कार्फ आणि एक भाकरीचा तुकडा एवढ्याच गोष्टी होत्या.





एकदा तिला वाटले की आपण जंगल पार केले की दुसऱ्या टोकाला कदाचित एखाद्या शहरात पोहोचू. तिथे कुणीतरी असा माणूस भेटू शकेल जो कामाच्या बदल्यात आपल्याला अन्न, कपडे आणि राहायला जागा देऊ शकेल.

म्हणून ती जंगलातून प्रवास करू लागली.

ती जंगलात फार दूर गेली नव्हती तेव्हा तिला एक भिकारी भेटला. “अगं मुली,” तो म्हणाला. “मला खूप भूक लागलीय. मला तुझ्याकडची भाकरी खायला दे, म्हणजे मी भुकेने मरणार नाही.”

ती मुलगीसुद्धा खूप भुकेली होती. पण ती दयाळू आणि नि:स्वार्थी असल्याने तिने भिकाऱ्याला आपला भाकरीचा तुकडा देऊन टाकला आणि ती पुढे चालू लागली.

बराच वेळ चालत राहिल्यामुळे ती थकून गेली. पण आराम करण्यासाठी थांबणे तिला शक्य नव्हते. कारण अजून ती जंगलातच होती आणि लवकरच रात्र होणार होती.





मग तिला एक बाई भेटली जी तिच्याजवळ येऊन म्हणाली, “मुली, वाऱ्याने माझं डोकं खूप गारठलंय. मला तुझा स्कार्फ दे. तो माझ्या डोक्याला ऊब देईल.”

लहान मुलीचे डोकेही वाऱ्यामुळे गारठले होते. पण ती खूप दयाळू आणि नि:स्वार्थी होती. तिने त्या बाईला स्कार्फ दिला आणि पुढे चालू लागली.



आता अंधार पडू लागला. पण लहान मुलगी चालत राहिली, रात्रीसाठी काही आसरा मिळेल या आशेने! थोड्या वेळाने, तिला एक लहान मुलगा भेटला.

तो थंडीने कापत होता. तो लहान मुलीला म्हणाला, “मला खूप थंडी वाजतेय. तुझं स्वेटर मिळालं तर मला ऊब मिळेल. प्लीज, देशील मला?” स्वेटरशिवाय आपण थंडीने गारठून जाऊ, याची कल्पना असतानाही मुलीने त्याला स्वेटर देऊन टाकला आणि ती पुढे चालू लागली.

आता मिट्ट काळोख पडला, खूप थंडीही पडली. लहान मुलगी जंगलात खूप आतवर पोहोचली होती. तिथे तिला आणखी एक मुलगा भेटला.

तो मुलगा एका झाडाला लगटून बसला होता, थंडीने अक्षरश: सुन्न झाला होता. त्याला पाहून लहान मुलगी त्याला म्हणाली, “माझे कपडे घाल. म्हणजे तुला ऊब मिळेल.”

तिला माहीत होते की आपले कपडे त्याला दिल्यावर आपल्या अंगावर फक्त एप्रन राहील. पण ती खूप दयाळू आणि नि:स्वार्थी होती. तिने आपले कपडे त्या मुलाला दिले आणि ती पुढे चालू लागली.





दूरवर प्रकाश दिसताच तिला वाटले की आपण एका शहराजवळ पोहोचलो आहोत. एका झाडावर चढून तिने निरखून बघितले तेव्हा तिला कळले की तो प्रकाश आभाळात चमकणाऱ्या चंद्राचा होता.

लहान मुलगी थंडीने कुडकुडत होती. ती खूप थकलीसुद्धा होती. ती एका झाडाखाली बसली. आपला एप्रन तिने अंगाभोवती लपेटून घेतला आणि ऊब मिळावी म्हणून शरीर झाडाच्या पानांनी झाकायचा प्रयत्न केला. यापूर्वी एवढी थंडी आणि दुबळेपणा तिने कधी अनुभवला नव्हता.

तिला रडू येऊ लागले. ती खूप घाबरली, तिला एकाकी वाटू लागले. अश्रू भरल्या डोळ्यांनी तिने आभाळाकडे पाहिले. आपले काय होणार, असा विचार तिच्या मनात आला. आभाळातील सुंदर तारे बघून तिने मनाशी एक इच्छा व्यक्त केली आणि मग झोपी गेली.



अचानक, एक तारा आभाळातून खाली पडला आणि लहान मुलगी जागी झाली. मग आणखी एक तारा खाली पडला, मग आणखी एक.

सुंदर, चमकते तारे खाली धरतीवर तिच्या सभोवती गोळा झाले. आश्चर्याने ती उठून उभी राहिली.

मग ती आपल्या एप्रनमध्ये तारे गोळा करू लागली. एप्रन ताऱ्यांनी झगमगू लागला. आणि मग, काही जादू घडून, तिच्या समोरची वाट ताऱ्यांच्या प्रकाशाने झळाळून निघाली, त्यावर ऊबेची चादर पसरली.





तारे पडत होते आणि त्यांनी एक वाट तयार केली होती. लहान मुलीला थोडे दूरवरून मंदसे संगीत ऐकू आले. तारे पुढे पुढे जाऊ लागले आणि तिचे वाटाडे बनले. ती त्यांची ऊब आणि तेज अनुभवत त्यांच्यामागोमाग चालू लागली.

ती चालू लागली तसे संगीत जास्त मोठ्याने ऐकू येऊ लागले. लवकरच, ती एका छोट्याशा घराजवळ पोहोचली. चिमणीतून धूर निघत होता. घराच्या अंगणात एक कुटुंब संगीत वाजवत होते, असे तिला दिसले.





ती घराच्या दिशेने चालू लागली. तारे जसे अचानक प्रकट झाले तसेच अचानक नाहीसेही झाले. आता त्या घरातून निघणारा प्रकाश सोडला तर, जंगल संपूर्णत: काळोखाने भरून गेले होते.



ती काही बोलण्याआधीच, संगीत थांबले. तिने त्या कुटुंबियांकडे पाहिले. तिला एक मधाळ आवाज ऐकू आला, “बाळा, कुठून आलीयस तू? एकटीच दिसतेयस, थंडीने कुडकुडतेयस, भुकेलीसुद्धा दिसतेयस. आमच्या घरात तुझं स्वागत आहे. आत ये, तुला काही खायला आणि अंगावर पांघरायला देते.”

लहान मुलीचा आपल्या कानांवर विश्वासच बसेना. हीच तर इच्छा तिने मघाशी व्यक्त केली होती.

तिने घरात प्रवेश केला. कुटुंबियांनी तिच्या अंगावर घोंगडी लपेटली, तिला आगीजवळ बसवले, तिला खायला पोळी दिली, प्यायला पाणी दिले. त्यांनी तिच्यासाठी मधुर संगीत वाजवले. तिने त्यांना आपली कहाणी सांगितली. ती ताऱ्यांच्या प्रकाशामागोमाग चालली आणि त्यांच्या घराजवळ पोहोचली, हे सांगितले.



तिला हे माहीत नव्हते की त्या कुटुंबानेसुद्धा त्या रात्री एक इच्छा व्यक्त केली होती. त्यांना आपल्या कुटुंबात एका लहान मुलीची असावी, अशी इच्छा व्यक्त केली होती. त्यांनी प्रकाशाने झळाळून निघालेली वाट पाहिली नाही, चमचमते तारे पाहिले नाहीत. पण त्यांना माहीत होते की ही लहान मुलगी काही खास कारणासाठीच त्यांच्या घरापर्यंत पाठवण्यात आली होती. त्यांची इच्छा पूर्ण झाली होती. मुलगी खूप दयाळू आणि नि:स्वार्थी असल्याने कुटुंबीयांचे तिच्यावर प्रेम जडले. त्यांनी तिला कायम आपल्यासोबत राहायला सांगितले. लहान मुलगी आनंदाने तयार झाली.



ती रात्र सगळ्यांसाठी खूप विलक्षण ठरली. त्यांच्या घरात आनंदाचे वातावरण होते. पण मनातल्या मनात प्रत्येकजण विचार करत होता....खरंच, तारे आभाळातून या महान मुलीच्या प्रवासाकडे लक्ष ठेवून होते? ती नि:स्वार्थी भावनेने इतरांना मदत करत होती, याला तारे साक्षी होते का? खरंच ते धरतीवर आले आणि तिचे वाटाडे बनले? की तिने फक्त स्वप्न बघितले?



रात्री उशीरा त्यांना आपल्या मनातील शंकांची उत्तरे मिळाली. कुटुंबियांनी लहान मुलीला एका आरामशीर बिछान्यात झोपवले. त्यांनी तिच्या अंगावर घोंगडीत पांघरली. लहान मुलीला तिच्या एप्रनच्या खिशात काही वस्तू असल्याचे जाणवले. तिने ती वस्तू खिशातून बाहेर काढताच खोली प्रकाशाने उजळून निघाली आणि शेकडो चमचमते तारे खाली पडले. पुन्हा एकदा संगीत ऐकू येऊ लागले. पण यावेळी संगीत आभाळातून ऐकू येत होते.





आणि मग प्रेमाने ओथंबलेल्या मनाने त्या सर्वांनी ईश्वराचे आभार मानले. परमप्रिय ईश्वराने त्यांना त्या दिवशी महत्त्वाची शिकवण दिली होती. आपल्याकडे जे काही आहे ते इतरांना वाटून टाकल्याने आपल्याला सुख आणि समाधान मिळते....आणि ईश्वर आपली इच्छा पूर्ण करतो.

समाप्त